**मानव संसाधन व्यवस्थापन प्रणाली (HRMS) ही ई-प्रशासन प्रणाली तयार करण्यासाठी प्रचलीत प्रकियेसंदर्भात मार्गदर्शन करण्यासाठी कोअर समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक , क्रमांक- एसआरव्ही-२०१६ /प्र.क्र.३४४/२०१६/कार्या.१२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२

दिनांक: ३१ डिसेंबर, २०१६

**वाचा-**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:-संगणक २०१६/प्रक्र २८६/का-१२, दिनांक: ८ जुलै, २०१६

**प्रस्तावना -**

राज्य शासनाच्या सेवेतील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सेवा विषयक बाबीसंदर्भातील कार्यवाहीच्या प्रक्रियेचे स्वयंचलन (automation) करण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग (सेवा) अंतर्गत मानव संसाधन व्यवस्थापन प्रणाली (Human Resource Management System - HRMS) हा ई-प्रशासन प्रकल्प राबविण्यात येत आहे. या प्रकल्पासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आली आहे. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या मान्यतेने वरील ई-प्रशासन प्रकल्पासाठी सल्लागार संस्थेची नियुक्ती करण्यात आली आहे. वरील प्रणाली विकसीत करण्यापूर्वी प्रकल्पाचा पूर्वभाग म्हणून मनुष्यबळ व्यवस्थापनाअंतर्गत येणाऱ्या विविध सेवाविषयक बाबींच्या प्रक्रियांच्या (उदा. भरतीप्रक्रीया, पदोन्नती, विभागीय चौकशी, गोपनीय अहवाल,मानीव दिनांक, परदेश दौरे इ.) सध्याच्या कार्यपध्दतीनुसार अभ्यास करून सल्लागार संस्थेस मार्गदर्शन करण्यासाठी या विषयातील अनुभवी अधिकाऱ्यांची कोअर समिती गठीत करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन परिपत्रक -**

मानव संसाधन व्यवस्थापन प्रणाली (Human Resource Management System - HRMS) हा ई-प्रशासन प्रकल्प राबविण्यासाठी सेवाविषयक बाबींचा प्रचलित कार्यपध्दतीनुसार अभ्यास करून सल्लागार संस्थेस तसेच विभागास मार्गदर्शन करण्यासाठी श्री सुरेश कुमार, सेवानिवृत्त भा.प्र.से यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रालयीन उप सचिवांची पुढीलप्रमाणे कोअर समिती गठीत करण्यात येत आहे :-

| **अ.क्र.** | **अधिकाऱ्यांचे पदनाम** | **पद** |
|---|---|---|
| १ | श्री. सुरेश कुमार, सेवानिवृत्ती भा.प्र.से. | अध्यक्ष |
| २ | श्री. व्यंकटेश भट, उपसचिव, गृह विभाग | सदस्य |
| ३ | डॉ. माधव वीर, उपसचिव, महसुल व वन विभाग | सदस्य |
| ४ | श्री. भा. ज. गाडेकर, उपसचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ५ | श्री. संजय बनकर, उपसचिव, ग्रामविकास विभाग | सदस्य |
| ६ | श्री. अ.ए. कुलकर्णी, उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ७ | श्री. सु. ह. उमराणीकर, उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग | सदस्य-सचिव |

२. उपरोक्त समितीचा कार्यकाल दोन महिन्यांचा राहील.

३. समितीची कार्यकक्षा पुढीप्रमाणे राहील -

१. मनुष्यबळ व्यवस्थापन प्रणाली अंतर्गत येणाऱ्या सेवाविषयक बाबींशी निगडीत असलेल्या विविध प्रक्रिया (उदा. भरतीप्रक्रीया, पदोन्नती, विभागीय चौकशी, गोपनीय अहवाल,मानीव दिनांक, परदेश दौरे इ.) सुटसुटीत व सोप्या भाषेत विहित करून सल्लागार संस्थेस उपलब्ध करून देणे

२. सेवा विषयक बाबींशी निगडीत विविध प्रक्रियेमध्ये सुधारणा करण्याची गरज भासल्यास तसे विभागास सुचविणे व त्यानुसार अशा विषयासंदर्भात वर नमूद केल्याप्रमाणे कार्यवाही करणे.

३. सल्लागार संस्थेने तयार केलेल्या विविध प्रक्रियांचे परीक्षण करणे.

४. विषयाच्या आवश्यकतेनुसार समिती मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील अन्य अधिकाऱ्यांना त्यांच्या बैठकीसाठी आमंत्रित करु शकेल.

५. वरील समितीची बैठक सर्वसाधारणपणे आठवडयातुन एकदा घेण्यात येईल व समितीच्या अध्यक्षांना प्रती बैठक रु.५०००/- इतके मानधन देय राहील. समितीच्या इतर सदस्यांना कोणतेही मानधन अनुज्ञेय असणार नाही. समितीच्या अध्यक्षांच्या मानधनावर होणारा खर्च ई-प्रशासन प्रकल्प राबविण्यासाठी या विभागास मंजुर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदींमधुन भागविण्यात येईल.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१६१२३११७४२४२२३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2016.12.31 17:46:10 +05'30'

**(सु. ह. उमराणीकर)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ श्री. सुरेश कुमार, सेवानिवृत्त( भा.प्र.से.)

२ श्री. व्यंकटेश भट, उपसचिव, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई
३ डॉ. माधव वीर, उपसचिव, महसुल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई
४ श्री. भा. ज. गाडेकर, उपसचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
५ श्री. संजय बनकर, उपसचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय,मुंबई
६ श्री. अ.ए.कुलकर्णी, उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
७ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८ निवड नस्ती, कार्या - १२